**नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर ३०९ विडी कामगारांच्या घरकुल योजनेसाठी अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**

गृहनिर्माण विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : एचएसजी २००२/प्र.क्र.१७४/गृनिधो-१,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ५ सप्टेंबर,२००२

**वाचा :** १) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक एचएसजी १०९७/ प्र.क्र.१९७/ गृनिधो-१, दिनांक १२ जुलै, २००१

२) केंद्र शासन, श्रम मंत्रालयाचे पत्र क्रमांक : डब्ल्युॲन्ड सीसी/एनजीपी/बी/२(१२),९९/०५, दिनांक १ एप्रिल, २००२

३) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक वाटप २००२/प्र.क्र.१००/अर्थसं-१, दिनांक १९.६.२००२.

**प्रस्तावनाः** विडी कामगारांचे जीवनमान उंचावले जावे यासाठी केंद्र शासनाकडून मिळणा-या अनुदानासोबत राज्य शासनानेही तेवढयाच प्रमाणात अनुदान दिले तर, त्या एकत्रित आर्थिक सहाय्यातून राज्यातील विडी कामगारांची घरकुल योजना अधिक कार्यक्षमतेने राबविली जाऊन त्याचा लाभ विडी कामगारांना मिळेल.

**शासन निर्णय :** नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित, सोलापूर या संस्थेस केंद्र शासनाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये रु.७,९८,०००/- एवढे अनुदान मंजूर केलेले आहे. केंद्र शासनाच्या अनुदानाएवढेच अनुदान राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल, या दि.१२.७.२००१ च्या शासन निर्णयास अनुसरुन नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित, सोलापूर या संस्थेस रु. ७,९८,०००/- (रुपये सात लाख, अठ्याण्णव हजार फक्त) इतके अनुदान खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

सदर रक्कम महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणामार्फत वितरीत करण्यात येईल. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने अवर सचिव, गृहनिर्माण विभाग (आहरण व संवितरण अधिकारी) यांच्या प्रतिस्वाक्षरीसह सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयात विहीत प्रपत्रात या आदेशांच्या

प्रतिसह सादर करावे. प्राधिकरणाने देयके तयार करुन आणि मंजूरी घेऊन मंजूर तरतूद संस्थेस वितरीत करावी. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास या योजनेंतर्गत बांधकाम होत असलेल्या घरांच्या प्रगतीबाबत नियंत्रण ठेवण्यास प्राधिकृत करण्यात आलेले आहे. त्यांनी अनुदानातून बांधकाम होते किंवा कसे याची सविस्तर माहिती ठेवणे आवश्यक राहील.

ज्या कारणासाठी अनुदान घेण्यांत आले आहे त्याच कारणासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणास योजनेंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील. जर वितरीत केलेली रक्कम घरकुल योजनेसाठी वापरली नाही तर सदर रक्कम प्राधिकरणाने व्याजासह वसूल करावी.

या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन /महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरिता/पहाणीकरीता सादर करण्यांत यावेत.

या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.क्यू-३ मुख्य लेखा शिर्ष २२१६- गृहनिर्माण ८० - सर्वसाधारण - १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - (०३)(०८) विडी कामगारांना घरकुलासाठी अनुदान (२२१६-१२०२), ४१ अर्थसहाय्य अनुदाने या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदरची रक्कम नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित, सोलापूर या संस्थेस वितरीत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक -९२१/व्यय-३, दि.३०.८.२००२ व अर्थोपाय अनौपचारिक संदर्भ क्र.२२९/अर्थोपाय/२००२ दिनांक ९.९.२००२ अन्वये दिलेल्या सहकतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(व.दा.राठोड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन..

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई

२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा) मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा) नागपूर
५) मा.प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई
९) मुख्य अधिकारी, पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे
१०) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई
११) अधिदान व लेखा आधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) अवर सचिव (रोख शाखा/अर्थसं-१) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१४) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, व्यय-३, अर्थोपाय/अर्थसंकल्प ३ व १६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (कार्या-१४७४) मंत्रालय, मुंबई.
१६) चेअरमन, नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित, सोलापूर
१६) निवड नस्ती, गृनिधो-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,

...........

**नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर ३०९ विडी कामगारांच्या घरकुल योजनेसाठी अनुदान वितरीत करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन,

**गृहनिर्माण विभाग,**
शुध्दीपत्रक, क्रमांक : एचएसजी २००२/प्र.क्र.१७४/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ सप्टेंबर,२००२

**वाचा :** १) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक एचएसजी २००२/ प्र.क्र.१७४/ गृनिधो-१, दिनांक १३ सप्टेंबर,२००२ व दिनांक १८ सप्टेंबर,२००२ चे शुध्दीपत्रक,
२) वित्त विभाग, अ.शा.पत्र क्रमांक संकीर्ण-१००२/प्र.क्र.२७/अर्थोपाय, दि. ५ जून, २००२

**शुध्दीपत्रक :** संदर्भ क्रमांक (१) शासन निर्णयातील शेवटचा परिच्छेद क्रमांक ७ (पान क्रमांक २) खालीलप्रमाणे वाचावे.

"सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९२१/व्यय-३, दिनांक ३०.८.२००२ व अर्थोपाय संदर्भ क्रमांक २२९/अर्थोपाय/२०२, दिनांक ९.९.२००२ अन्वये संदर्भ क्रमांक २ येथील पत्रातील १(ड) शिथिल करण्यासह दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(र.सि.कवळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा) मुंबई

३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा) नागपूर
५. मा.प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई
९. मुख्य अधिकारी, पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे
१०. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई
११. अधिदान व लेखा आधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. अवर सचिव (रोख शाखा/अर्थसं-१) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
१४. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, व्यय-३, अर्थोपाय/अर्थसंकल्प ३ व १६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (कार्या-१४७४) मंत्रालय, मुंबई.
१६. चेअरमन, नरसिंह विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित, सोलापूर
१७. निवड नस्ती, गृनिधो-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,

...........

